**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील "सहसंचालक, आरोग्य सेवा" या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदोन्न-१११७/प्र.क्र.११२/सेवा-२**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार संकुल इमारत १० वा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : २९ ऑक्टोबर, २०२१

**वाचा –** सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्रमांक- ईएसबी-११२१/प्र.क्र.१४९/१३, दि.२०.०९.२०२१.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील खालील उपसंचालक, आरोग्य सेवा (वेतनस्तर एस-२५ : ७८८००-२०९२००) या संवर्गातील अधिकाऱ्यांना सहसंचालक, आरोग्य सेवा (वेतनस्तर एस-२६: ८२२००-२११५००) या संवर्गातील पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर या आदेशाद्वारे विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. प्रस्तुत पदोन्नतीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची पदस्थापना खालील विवरणपत्रामधील "स्तंभ-४" मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | डॉ. स्वप्निल विष्णू लाळे, उपसंचालक, आरोग्य सेवा औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद. | खुला | सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्यरोग), पुणे. (रिक्त पदी) |
| २. | डॉ. नितीन नथ्थुजी अंबाडेकर, सहसंचालक, आरोग्य सेवा (रूग्णालये), मुंबई. (पदश्रेणी अवनत) | इमाव | सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई. (रिक्त पदी) |
| ३. | डॉ. विजय पोशेट्टीवार कंदेवाड, सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राथमिक आरोग्य केंद्र/ उपकेंद्र/ दवाखाने), मुंबई. (पदश्रेणी अवनत) | अ.ज. | सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राथमिक आरोग्य केंद्र/ उपकेंद्र/ दवाखाने), मुंबई. (रिक्त पदी) |

२. सदर पदोन्नती आस्थापना मंडळाने केलेल्या शिफारशीनुसार व सहसंचालक, आरोग्य सेवा या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार देण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे. तसेच, रिट पिटीशन स्टॅंप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटिशन स्टॅंप नं.१०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असून, सदर पदावर संबंधीतांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही. तसेच सदर पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत. सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित केल्यानंतर पदोन्नतीच्या पदावर सेवाज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पदोन्नत अधिकारी पात्र ठरतील.

५. पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा, असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेवर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर होऊन, त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई यांना व शासनास सादर करावा. पदस्थापना बदलून घेण्यासाठी राजकीय दबाव आणल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरेल.

७. पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर विहित मुदतीत हजर व्हावे. जे अधिकारी विहित मुदतीत पदोन्तीवर हजर होणार नाहीत ते पदोन्नतीस इच्छुक नाहीत असे गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच, त्यांना देण्यात आलेला आश्वासीत प्रगती योजनेचा लाभ काढून घेण्यात येईल. तसेच, अधिकाऱ्यांनी पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल. या प्रकरणी संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई यांनी संबंधीत अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर ते नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबतचा अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत शासनास सादर करावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२९१५२५३२५८१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2021.10.28 07:37:50 +05'30'

(चंद्रकांत ह. वडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्रान्वये)
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.

४. संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे.
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
७. सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
८. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
९. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
१०. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११. वैद्यकीय अधिक्षक, स्त्री रूग्णालय (सर्व)
१२. वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय, नाशिक/ अमरावती.
१३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१५. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१६. मा. मंत्री (आरोग्य)/मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१७. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१३, मंत्रालय, मुंबई
१८. अपर मुख्य सचिव (सा.आ.वि) यांचे स्विय सहायक
१९. सर्व सह सचिव/उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. सर्व संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे मार्फत)
२१. निवडनस्ती सेवा-२